**विशेष सहाय्य योजनेतील लाभार्थ्यांना अर्थसहाय्याचे वितरण डी.बी.टी. पोर्टलद्वारे करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : विसयो-२०२४/प्र.क्र.०४/विसयो**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ११ एप्रिल, २०२५.

**वाचा :**

१. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य, क्र.विसयो-२०१८/प्र.क्र.६२/ विसयो, दि. २० ऑगस्ट, २०१९.
२. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य, क्र.विसयो-२०२२/प्र.क्र.१२०/ विसयो, दि. ०५ जुलै, २०२३.
३. शासन पत्र, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य, क्र.विसयो-२०२४/प्र.क्र.०४/विसयो, दि. १२.०१.२०२४ चे कार्यादेश.
४. शासनाचे सम क्रमांकांचे दिनांक १८.१२.२०२४ रोजीचे अर्धशासकीय पत्र.
५. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य, क्रमांक : विसयो-२०२४/प्र.क्र.०४/ विसयो, दिनांक १९ डिसेंबर, २०२४.
६. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य, क्रमांक : विसयो-२०२४/प्र.क्र.०४/ विसयो, दि.०३.०१.२०२५, दि.०७.०२.२०२५, दि.१८.०२.२०२५ व दि.२४.०३.२०२५.

**प्रस्तावना :-**

सामाजिक न्याय आणि विशेष सहाय्य विभागांतर्गत राज्य पुरस्कृत संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना या योजना आणि केंद्र पुरस्कृत इंदिरा गांधी राष्ट्रीय वृद्धापकाळ निवृत्तीवेतन योजना, इंदिरा गांधी राष्ट्रीय विधवा निवृत्ती वेतन योजना व इंदिरा गांधी राष्ट्रीय दिव्यांग निवृत्ती वेतन योजना या योजना राबविण्यात येत आहेत.

माहे, डिसेंबर, २०२४ पासून राज्य पुरस्कृत योजनांच्या पात्र लाभार्थ्यांना अर्थसहाय्याचे वितरण DBT (Direct Benefit Transfer) Portal मार्फत करण्यात येत आहे. त्यानुसार राज्य पुरस्कृत व केंद्र पुरस्कृत योजनांचे माहे मार्च, २०२५ पर्यंतचे अर्थसहाय्य DBT द्वारे थेट लाभार्थ्यांच्या खात्यात जमा करण्यात आले आहे. आता, सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून विशेष सहाय्य योजनेतील लाभार्थ्यांना माहे एप्रिल, २०२५ चे अर्थसहाय्य DBT (Direct Benefit Transfer) Portal मार्फत थेट त्यांच्या बँक खात्यात जमा करावयाचे आहे. त्यासाठी सदरहू योजनांकरीता स्टेट बँक ऑफ इंडियामध्ये उघडण्यात आलेल्या स्वतंत्र योजनानिहाय बँक खात्यामध्ये निधी वर्ग करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य पुरस्कृत संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना या योजनेतील लाभार्थ्यांना माहे डिसेंबर, २०२४ पासून अर्थसहाय्याचे वितरण डी.बी.टी. पोर्टलद्वारे करण्यात येत आहे.

२. राज्य पुरस्कृत संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना तसेच केंद्र पुरस्कृत इंदिरा गांधी राष्ट्रीय वृद्धापकाळ निवृत्तीवेतन योजना, इंदिरा गांधी राष्ट्रीय विधवा निवृत्ती वेतन योजना व इंदिरा गांधी राष्ट्रीय दिव्यांग निवृत्ती वेतन योजना (NSAP) या योजनेतील लाभार्थ्यांना माहे एप्रिल, २०२५ चे अर्थसहाय्य DBT पोर्टलद्वारे थेट त्यांच्या बँक खात्यात जमा करण्यासाठी सदरहू योजनांकरीता स्टेट बँक ऑफ इंडियामध्ये उघडण्यात आलेल्या स्वतंत्र योजनानिहाय बँक खात्यामध्ये पुढील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे निधी वर्ग करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

**(रुपये हजारात)**

| अ.क्र. | योजनेचे नांवसंगणक सांकेतांक /लेखाशीर्ष / | सन २०२५-२६ साठी एकुण मंजूर तरतूद | SNA खात्यात वर्ग करावयाचा निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | "मागणी क्रमांक एन-३, मुख्य लेखाशीर्ष २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, १०४-वृध्द विकलांग व निराश्रीत व्यक्तींचे कल्याण (०८) (०९) संजय गांधी निराधार अनुदान योजना (कार्यक्रम) (२२३५ अे २९४) ५०-इतर खर्च" | ९८००००००.००० | २०५८०००.००० |
| २ | "मागणी क्रमांक एन-३, मुख्य लेखाशीर्ष २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, ७८९ अनुसूचित जाती उपयोजना, (०१) वृध्द, दुर्बल व निराधारांना अनुदान, (०१) (०१) संजय गांधी निराधार अनुदान योजना (अजाउयो) (कार्यक्रम), ५०-इतर खर्च, (२२३५ सी १३४) " | ४७५००००.००० | ४२७५००.००० |
| ३ | "मागणी क्रमांक टी-५, मुख्य लेखाशीर्ष २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजनांतर्गत योजना (ओटीएसपी), (०२) (०३) संजय गांधी निराधार अनुदान योजना (कार्यक्रम), ५०-इतर खर्च, (२२३५ सी १६१) " | ३००००००.००० | ३०००००.००० |
| ४ | "मागणी क्रमांक एन-३, मुख्य लेखाशीर्ष २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, १०४-वृध्द विकलांग व निराश्रीत व्यक्तींचे कल्याण (०८) (०७) श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना (कार्यक्रम) (२२३५ ३११२), ५०-इतर खर्च" | १६४०६४००.००० | ३६०९४०८.००० |

| | | | |
|---|---|---|---|
| ५ | "मागणी क्रमांक एन-३, मुख्य लेखाशीर्ष २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, ७८९ अनुसूचित जाती उपयोजना, (०१) वृध्द, दुर्बल व निराधारांना अनुदान, (०१) (०२) श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना (अजाउयो) (कार्यक्रम), ५०-इतर खर्च, (२२३५ सी १४३) " | ८५०००००.००० | ८५००००.००० |
| ६ | "मागणी क्रमांक टी-५, मुख्य लेखाशीर्ष २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजनांतर्गत योजना (ओटीएसपी), (०२) (०४) श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना (कार्यक्रम), ५०-इतर खर्च, (२२३५ सी १७२)" | ५००००००.००० | ५०००००.००० |
| | **एकूण** | ४७४५६४००.००० | ७७४४९०८.००० |

४. या अर्थसहाय्याबाबत सह सचिव (अर्थसंकल्प) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग हे नियंत्रक अधिकारी तसेच अवर सचिव (रोख शाखा) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील. वित्त विभाग शासन निर्णय, दिनांक १२.०१.२०२३ नुसार सदरचे अर्थसहाय्य बिनशर्त आहे. त्यांनी सदर अर्थसहाय्य म.को.नि. ४४-अ मधील नमुन्यातील देयकान्वये आहरीत करावे.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०४१११३०५४१२३२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2025.04.11 13:06:55 +05'30'

**(प्रशान्त पुं. वाघ)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई (२ प्रती)
३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
४. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
५. वित्त विभाग, अर्थसंकल्प ३ ,४, ५ अर्थोपाय व व्यय १४, मंत्रालय, मुंबई
६. सह सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सहाय्यक संचालक (वित्त व लेखा), लेखापरिक्षण कक्ष, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. संचालक, महाआयटी कार्पोरेशन लिमिटेड, मुंबई.
९. निवड नस्ती, विसयो.